यंत्रमागधारकांना विद्युत दरात देण्यात येणा-या सवलतीपोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत. मे. वेलकॉड टेक्सटाईल्स लिमिटेड.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. टॅरिफ-२०१३/प्र.क्र.८९/ऊर्जा-३,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक:- २५ मे, २०१५**

संदर्भ:- १. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ-२००८/प्र.क्र.१४/ऊर्जा-३ दिनांक २६/०२/२००८
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टेरीफ-२००८/प्र.क्र.१४१/ऊर्जा-३ दिनांक ३१/०१/२००९
३. मुख्य अभियंता (विद्युत) यांचे पत्र क्र.का-५(७)/२४९३/सन २०११, दि.२८/०५/२०१३, क्र.५०३८/सन २०१३, दि.१८/१२/२०१३, व ३९८६-२०१४ दि.२७/११/२०१४,
४. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५

**प्रस्तावना :-**

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार राज्यातील यंत्रमागधारकांना शासनामार्फत वीजेच्या दरात सवलत देण्यात येते. या सवलतीपोटी देय असलेली रक्कम संबधित अनुज्ञप्ती धारकांमार्फत यंत्रमाग धारकांना परत केली जाते. शासनाच्या सदर धोरणानुसार टाटा पॉवर कंपनीच्या कार्यकक्षेत असलेल्या मे. वेलकार्ड टेक्सटाईल्स, मिरारोड (पूर्व) ठाणे, यांना दिनांक ०१/०८/२००९ ते ३०/०६/२०१२ या कालावधीत विद्युत दरात दिलेली सवलतीची रक्कम रु.३७,३५,२६७/- (रुपये सडतीस लाख पसतीस हजार दोनशे सदुष्ठ फक्त) परत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मे.टाटा पावर कंपनी लिमिटेडचे वीज ग्राहक असलेल्या मे. वेलकॉड टेक्सटाईल्स लिमिटेड, मिरारोड (पूर्व) ठाणे, या यंत्रमाग धारकाला (ग्राहक क्र.१०२६६२) माहे ०१/०८/२००९ ते ३०/०६/२०१२ पर्यंत देय असलेल्या वीज दर सवलतीपोटी रु.३७,३५,२६७/- (रुपये सडतीस लाख पसतीस हजार दोनशे सदुष्ठ फक्त) इतकी रक्कम परत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कम मे. टाटा पॉवर कंपनी यांचेमार्फत यंत्रमागधारकाला वितरित करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्क्म ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबीचा खर्च “मागणी क्र. के-६, वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००),(००)(०१) कृषिविषयक व यंत्रमागविषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण/पारेषण परवाना धारकाना अर्थसहाय्य (योजनेतर)(२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य” या खाली खर्ची टाकावा व तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून मे. वेलकॉड टेक्सटाईल्स., मिरारोड (पूर्व) ठाणे, यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे.मांडवे,उप सचिव यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी रक्कम रु.३७,३५,२६७/- (रुपये सडतीस लाख पसतीस हजार दोनशे सदुष्ठ फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन मे. टाटा पॉवर लि. (The Tata Power Co. Ltd) यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या कॅशप्लोच्या (मासिक वितरण) मर्यादेत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ- क्र.१०७/१५/व्यय-१६ दि. ०७/०५/२०१५ तसेच शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/०४/२०१५ च्या परिपत्रकानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०५२५१८१९१४९०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: CN = Vilas M Rajurkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.25 18:20:13 +05'30'

**(वि.म. राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत :**

१) व्यवस्थापकीय संचालक, टाटा पॉवर लिमीटेड, बॉम्बे हाऊस, २४, होमी मोदी स्ट्रिट, मुंबई-४००००१.
२) मे.वेलकॉड टेक्सटाईल्स लिमिटेड, प्लॉट नं.२३, मिराको आ आ इंडस्ट्रिज इस्टेट मिरागाव, मिरारोड (पूर्व), ठाणे-४०११०४.
३) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, ३ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४००००१.
४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबुर (पूर्व), मुंबई-४०००७१.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई४०००२०.
६) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई४०००२०.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१०) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११) कक्ष अधिकारी (प्रशासन-१), ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२) वित्त विभाग-(अर्थसंकल्प-३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३) निवड नस्ती (ऊर्जा-३), ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.